**नवी मुंबई विशेष आर्थिक क्षेत्र (स्पेशल इकॉनॉमिक झोन) विकसित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.सिआयडी ३३०२/७१५/प्र.क्र.९३/नवि-१०**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**

**दिनांक : ११ सप्टेंबर, २००२.**

**पार्श्वभूमी :**

विशेष आर्थिक क्षेत्र या संकल्पनेत मुक्त परदेशी गुंतवणूकीस भरपूर वाव देणारी औद्योगिक वसाहत तयार करणे अभिप्रेत आहे. तांत्रिक अडचणी आणि शासकीय औपचारिकता यापासून मुक्त वातावरण, निर्यातयोग्य वस्तुंची निर्मिती तसेच आंतरराष्ट्रीय सेवा क्षेत्रास पुरक असे वातावरण येथे असेल. त्यामुळे तेथे नोकरी, उद्योग आणि व्यवसायाच्या अनेक संधी उपलब्ध होतील. मुक्त व्यवसायाद्वारे गतिमान आर्थिक विकास साधणारी प्रभावी यंत्रणा अशी विशेष आर्थिक क्षेत्र प्रकल्पाची संकल्पना आहे.

औद्योगिक क्षेत्रातील महाराष्ट्राचे स्थान अग्रेसर ठेवण्याबाबत शासन सतत प्रयत्नशील आहे. त्यानुसार विशेष आर्थिक क्षेत्र स्थापन करण्यासाठी शासनाने सिडकोची समन्वयन संस्था (nodal agency) म्हणून नेमणूक केली. केंद्र शासनाच्या वाणिज्य

विभागाने फेब्रुवारी,२००२ मध्ये नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्यास मान्यता दिली आहे.

सिडकोमार्फत खाजगी गुंतवणूकीद्वारे नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र विकसित करण्याबाबतचा प्रस्ताव राज्य शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावावर शासनाने सर्वांगीण विचार करुन पुढीलप्रमाणे निर्णय घेतले आहेत :-

**शासन निर्णय :**

१) नवी मुंबई येथे विशेष आर्थिक क्षेत्र सिडकोने संयुक्त उपक्रमाद्वारे (joint sector venture) विकसित करण्यासाठी निविदा प्रक्रिया सुरु करावी व शक्यतो तीन महिन्यात पूर्ण करावी,

२) विशेष आर्थिक क्षेत्राच्या सर्वांगीण विकासासाठी व त्याबाबत निर्णय घेण्यासाठी मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखाली एक शक्तिप्रदान समिती नेमण्यात यावी. ही समिती स्ट्रॅस्टेजिक गुंतवणूकदाराची नियुक्ती,दस्तऐवज, इत्यादिंना मान्यता देईल. मुख्य सचिवांची समिती दैनंदिन कामकाजावर नियंत्रण ठेवण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, सिडको यांच्या अध्यक्षतेखाली एक तज्ञ समिती गठीत करील. सदर समितीस पूर्ण स्वायत्तत्ता राहील

आणि सदर समिती विशेष आर्थिक क्षेत्राचे दैनंदिन कामकाज पाहील,

३) संयुक्त उपक्रमातील गुंतवणूक,विकास आणि पणन यातील बहुतांश भागीदारी (majority stake) ही स्ट्रॅटेजिक इनव्हेस्टर्स यांना देण्यात यावी,

४) विशेष आर्थिक क्षेत्राचे नियोजन व विकासाबाबत वेळोवेळी आढावा घेण्यासाठी मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली संनियंत्रण समिती स्थापन करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रामानंद तिवारी )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

मा.राज्यपालांचे प्रधान सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
मा.राज्यमंत्री (नगर विकास विभाग)
मा.मुख्य सचिव
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग)